राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजनेसाठी सन २०१७-१८ करिता अनुदान वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सानुग्रह-२०१७/प्र.क्र.१११/१७/एसडी-६**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-३२
तारीख: १२ जुलै, २०१७

**वाचा -**

१) विभागाचा शासन निर्णय क्रमांकः पीआयई२०११/प्र.क्र.२४९/प्राशि-१, दि. ११.७.२०११.
२) विभागाचा शासन निर्णय क्रमांकः पीआयई२०११/प्र.क्र.२४९/प्राशि-१, दि. १.१०.२०१३.
३) विभागाचा शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २४१६/(४९/१६)/अर्थसंकल्प, दि. ९.८.२०१६.
४) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि. १८.४.२०१७.
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि. ३०.६.२०१७.

**प्रस्तावना -**

विभागाच्या शासन निर्णय क्र.पीआरई-२०११/प्र.क्र.२४९/प्राशि-१, दि.१.१०.२०१३ अन्वये इयत्ता १ली ते १२वी पर्यंत शिकणा-या मुला/मुलींना अपघातामुळे क्षतीची नुकसान भरपाई इत्यादी देण्याबाबत राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजना सन २०१२-१३ पासून नियमित स्वरूपात राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. या योजने अंतर्गत राज्यात सन २०१७-१८ या वर्षात एकूण प्रलंबित लाभार्थ्यांची संख्या ६२३ इतकी असून, प्रलंबित लाभार्थ्यांसाठी रू.४,६६,८८,०००/-(अक्षरी रुपये चार कोटी सहासष्ठ लाख अठ्ठयाऐंशी हजार फक्त) इतक्या अनुदानाची आवश्यकता आहे.

**शासन निर्णय-**

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजनेसाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या निधीमधून एकूण रू.४,६६,८८,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी सहासष्ठ लाख अठ्ठयाऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजनेसाठी वितरीत करण्यात येणारा एकूण रू.४,६६,८८,०००/- इतका निधी मागणी क्र.ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण - ८०० इतर खर्च, पंचवार्षीक योजानांतर्गत योजना (०६)(०२), राज्यातील विद्यार्थ्यांसाठी राजीव गांधी विद्यार्थी अपघात योजना (२२०२ ३१०९) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीमधून वितरित करण्यात यावा. वरील खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १८.४.२०१७ च्या व दि. ३०.६.२०१७ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी, तसेच शिक्षण निरीक्षक (उत्तर/दक्षिण/पश्चिम), मुंबई व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १८.४.२०१७ व दि. ३०.६.२०१७ च्या परिपत्रकास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. दि. १८.४.२०१७ रोजीच्या परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची तसेच त्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता करण्याची दक्षता मा. आयुक्त (शिक्षण), पुणे यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१२१६३९०२४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.07.12 16:36:02 +05'30'

**( डॉ.सुवर्णा खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. विरोधी पक्ष नेता, (विधान सभा/ विधान परिषद), विधानभवन, मुंबई.
३. सर्व मा. विधान सभा सदस्य/ विधान परिषद सदस्य, विधानभवन, मुंबई.
४. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मुंबई.
५. मा. आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे यांचे विशेष कार्य अधिकारी, मुंबई
७. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
८. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), शिक्षण संचालनालय, पुणे .
९. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
११. शिक्षण संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे
१२. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
१३. विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
१४. शिक्षण अधिकारी (माध्यमिक, प्राथमिक, निरंतर)
१५. शिक्षण निरीक्षक (उत्तर/दक्षिण/पश्चिम), मुंबई.
१६. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.

१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ / २ , मुंबई / नागपूर
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ / २ , मुंबई / नागपूर
२०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
२२. लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई /पुणे /नागपूर/ औरंगाबाद
२३. वित्त विभाग (व्यय-५) / अर्थसंकल्प शाखा, मंत्रालय, मुंबई.
२४. अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. निवड नस्ती (एसडी-६).